**बीड जिल्हयातील राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन योजनेंतर्गत सन २०१३-१४ व सन २०१४-१५ मधील लाभार्थी शेतकऱ्यांचे प्रलंबित अनुदान वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र.सुसिंयो-२०२२/प्र.क्र.२५०/१४-अे**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२३.

**संदर्भ :** १. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने सन २०२१ करिता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-२०२२/प्र.क्र.१९४/१४-अे, दि. १५ सप्टेंबर, २०२२.

३. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ-२०२२/सुसिंयो/विसआ-२८६/४१९२४/फलो, दि. १३ डिसेंबर, २०२२.

४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-२०२२/प्र.क्र.१९४/१४-अे, दि. १२ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन योजनेंतर्गत (NMMI) सन २०१३-१४ मधील व शेतावरील पाणी व्यवस्थापन योजनेंतर्गत (OFWM) सन २०१४-१५ मधील सूक्ष्म सिंचन संचासाठी प्राप्त अर्जांपैकी ई-ठिबक प्रणालीवरील बीड जिल्हयातील प्रलंबित लाभार्थ्यांच्या यादीत काही लाभार्थ्यांचे बील ईनव्हाईस, मोका तपासणीस्तर, फिक्सींग ऑफ सबसीडी या स्तरावर आढळून आल्याने सन २०१३-१४ व सन २०१४-१५ मधील ५२१ लाभार्थी शेतकऱ्यांचे अनुदान वितरण करावयाचे राहीले होते. त्याबाबत सन २०२० च्या विधिमंडळ कामकाजाचेवेळी तत्कालीन मा. मंत्री (कृषि) यांनी सदर प्रलंबित अनुदानाची तपासणी करुन पुढील कार्यवाही करण्यात येईल असे आश्वासन दिले होते. त्यानुषंगाने कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये बीड जिल्हयातील सूक्ष्म सिंचनाचे सन २०१३-१४ व सन २०१४-१५ मधील लाभार्थ्यांचे प्रलंबित अनुदानाबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर लाभार्थी शेतकऱ्यांचे प्रलंबित अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. बीड जिल्हयातील सन २०१३-१४ मधील राष्ट्रीय सूक्ष्म सिंचन योजनेंतर्गत (NMMI) व सन २०१४-१५ मधील शेतावरील पाणी व्यवस्थापन योजनेंतर्गत (OFWM) सूक्ष्म सिंचन संचासाठी प्राप्त

अर्जापैकी पुर्वसंमती असूनही अनुदानाअभावी प्रलंबित राहिलेल्या लाभार्थी शेतकऱ्यांचे प्रलंबित अनुदान वितरीत करण्यासाठी सन २०२२-२३ करिता राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या योजनेच्या सर्वसाधारण प्रवर्गासाठी मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतुन रु. १.६५ कोटी निधी विनियोगात आणण्यात यावा. सदर निधीचे केंद्र व राज्य हिश्श्याचे विवरण पुढीलप्रमाणे :

**(रु. लाखात)**

| अ. क्र. | योजनेचे नाव | केंद्र हिस्सा (६०%) (लेखाशिर्ष - २४०१२५०४) | राज्य हिस्सा (४०%) (लेखाशिर्ष - २४०१एर९६) | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) | ९९.०० | ६६.०० | १६५.०० |

२. उपरोक्त निधीचा विनियोग करताना संदर्भ क्र. १ अन्वये निर्गमित राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. उपरोक्त निधीचा लाभ बीड जिल्हयातील सन २०१३-१४ व सन २०१४-१५ मधील सूक्ष्म सिंचनाचे लाभार्थ्यांचे प्रलंबित अनुदान वितरीत करण्यासाठीच विनियोगात आणला जाईल व दुबार / अतिरिक्त अनुदानाचे वितरण होणार नाही याची दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ३७५/२०२२/व्यय-१, दि. ३०/१२/२०२२ अन्वये दिलेल्या मंजूरीच्या अनुषंगाने व त्यांच्या निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२२७११२१२१०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by KARAD SANTOSH BANSIRAO
Date: 2023.02.27 11:26:44 +05'30'

**(संतोष ब. कराड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
७. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
९. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
१०. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर,
११. वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प १३), मंत्रालय मुंबई,
१२. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती.